न.वि.२९

प्रादेशिक योजना - पुणे
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम, १९६६ चे कलम-२०(४)
अन्वये स.नं.५६/३,४,५ व ग.नं.५७
मौ.पिंपळे जगताप या जमिनीचा
फेरबदल करणेबाबत.

२५३/नावि-२९
७५/२००९

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-१८०७/१२०१/प्र.क्र.९०५/२००७/नवि-१३
दिनांक :- ३१.०८.२००९

शासन निर्णय :- सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रा मध्ये प्रसिद्ध करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

(बि. म. सनडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हाधिकारी पुणे,
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिद्ध करून त्याच्या प्रत्येकी १० प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, जिल्हाधिकारी, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे, यांना पाठवाव्यात)

कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिद्ध करावी.

निवडनस्ती (नवि-१३).

# अधिसूचना

## महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- ३१.०८.२००९

क्रमांक-टिपीएस-१८०७/२११८/प्र.क्र.९०५/२००७/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, पुणे जिल्हयाची प्रादेशिक योजना (यापुढे जिचा उल्लेख "उक्त प्रादेशिक योजना" असा करण्यात आला आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ (महाराष्ट्र अधिनियम, ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" म्हणून संबोधिलेला) च्या कलम १५ नुसार महाराष्ट्र शासनाच्या नगर विकास विभागाची अधिसूचना क्र.टिपीएस-१८९५/सीआर-२६/९५/नवि-१२, दिनांक २५ नोव्हेंबर १९९७ (यापुढे "उक्त अधिसूचना" म्हणून संबोधिलेली) अन्वये मंजूर केली असून ती दिनांक १० फेब्रुवारी १९९८ पासून अंमलात आलेली आहे.

आणि ज्याअर्थी, उक्त प्रादेशिक योजनेच्या नकाशानुसार मौजे-पिंपळे-जगताप, तालुका-शिरुर येथील ग.नं.५६/३,४,५ अणि ५७ या जमिनी रहिवास विभागात समाविष्ट असुन (यापुढे ज्यांचा उल्लेख "उक्त जमिनी" असा करण्यात आला आहे); आणि प्रस्तावित १८ मी. आणि २४ मी. रुंदीच्या रस्त्याने बाधीत आहेत;

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या (यापुढे जिचा उल्लेख "उक्त अधिनियम" असा करण्यात आला आहे) चे कलम २० पोटकलम (२) मधील तरतुदीनुसार, काही अटीवर उक्त जमिन "रहिवास विभागातुन" वगळून "औद्योगिक विभागात" समाविष्ट करणे (यापुढे ज्याचा उल्लेख "उक्त फेरबदल" असा करण्यात आला आहे) उचित होईल असे शासनाचे मत आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम २० चे पोटकलम (३) च्या तरतुदीनुसार उक्त जमिनी रहिवास विभागातून वगळून औद्योगिक विभागात समाविष्ट करण्यासाठी शासनाच्या नगर विकास विभागाने क्र.टिपीएस-१८०७/१२०१/प्र.क्र.९०५/२००७/नवि-१३, दि.५.४.०८ अन्वये आम जनतेच्या हरकती/सूचना मागविण्यासाठीची नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्र भाग-१ पुणे विभागीय पुरवणीत दि.१.५.२००८ रोजी पृ.क्र.१०६१ ते १०६३ वर प्रसिध्द केली आणि विहित मुदतीत प्राप्त सूचना हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता अधिकारी म्हणून उपसंचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे यांची नियुक्ती करण्यात आली होती. (यापुढे "उक्त अधिकारी" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिकाऱ्याचा प्राप्त अहवाल व संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे सल्ला घेतल्यानंतर उक्त जमिन अटीसापेक्ष शेती तथा ना विकास विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे;

त्याअर्थी, आता उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्या अनुषंगाने प्राप्त अधिकारात शासन उक्त जमिनीबाबतच्या उक्त फेरबदल प्रस्तावास अटीसापेक्ष पुढील प्रमाणे मंजूरी देत आहे व त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजूरीच्या दिनांक २५.११.१९९७ च्या अधिसूचनेतील फेरबदलांच्या अनुसूचीमध्ये शेवटीच्या नोंदीनंतर पुढील नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे.

नोंद

"ग.नं.५६/३,४,५ अणि ५७ मौजे-पिंपळे-जगताप, तालूका-शिरुर, जि.पुणे या जमिनी रहिवास विभागातून वगळून खालील अटीसापेक्ष औद्योगिक विभागात समाविष्ट करण्यात आल्या आहेत".

अट क्र.१ - प्रश्नाधिन जमिनीकरीता आवश्यक असणा-या सर्व पायाभूत सुविधा मिळकतधारक स्वखर्चाने उपलब्ध करुन देतील.

अट क्र.२ - महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाच्या नियम आणि निकषांनुसार प्रदूषण प्रतिबंधात्मक उपाययोजना विकासक स्वखर्चाने उपलब्ध करुन घेतील.

अट क्र.३ - सदर औद्योगिक जमिनीमध्ये रहिवासी विभागापासून २३ मी. रुंदीचा बफर पट्टा ठेवणेत यावा.

टिप :-

अ) उक्त मंजूर फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा क्र.टिपीएस-१८०७/१२०१/प्र.क्र.१०५/२००७/नवि-१३, नागरिकांच्या अवलोकनार्थ कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये खाली नमूद केलेल्या कार्यालयामध्ये १ महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

१) उपसंचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे. स.नं.७४/२, सहकारनगर, बँक ऑफ महाराष्ट्रचेवर, पुणे-९.

२) जिल्हाधिकारी, पुणे.

३) सहाय्यक संचालक, नगर रचना, पुणे शाखा, पुणे.

ब) सदर फेरबदलाची अधिसूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.म.रानडे)

शासनाचे अवर सचिव, महाराष्ट्र राज्य

## NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Date - 31.08.2009**

No.TPS-1807/1201/C.R.905/2007/UD-13

Maharashtra Regional & Town Planning Act 1966.

Whereas, the Government in Urban Development Department vide its Notification No .TPS-1895/227/CR-26/95/UD-13, Dated 25th November 1997 (hereinafter referred to as "the said Notification") has sanctioned the Regional Plan for Pune District (hereinafter referred to as "the said Regional Plan") under section 15 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966(Maharashtra Act No.XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") so as to come into force with effect from 10th February 1998;

And whereas, as per the proposals of the said Regional Plan the lands bearing Gat.No.56/3,4,5 & 57 of Mouje-Pimple-Jagtap, Taluka-Shirur are included in the "Residential Zone" (hereinafter referred to as "the said lands") & affected by 18 m. & 24 m. wide road;

And whereas, Government of Maharashtra is of the opinion that the lands from the "Residential Zone' shall be included in "Industrial Zone" under sub section (2) of section 20 of the Maharashtra Regional & Town Planning Act 1966 (hereinafter referred to as the said Act) subect to condition;

And whereas, the notice regarding the proposed modification under sub-section (3) of section 20 of the Maharashtra Regional and Town Planning Act 1966 (Maharashtra Act XXXVII of 1966)(hereinafter referred to as "the said Act") inviting suggestions/objections from General public vide Urban Development Notice No.TPS-1807/1201/C.R.905/2007/UD-13 dated 5.4.2008 was published, which appeared in Maharashtra Government Gazette part-1 Pune dated 1.5.2008 on page No.1061 to 1063. The Deputy Director of Town Planning, Pune Division Pune was appointed as an officer by Government to hear suggestions/objections and submit his report to Government (hereinafter referred to as "the said Officer");

And whereas, after considering the report submitted by the said Officer and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune, Government is of the opinion that zoning of the said land shall be changed from "Residential Zone" to "Industrial Zone" with condition;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub section (4) of section 20 of the said Act, the Government hereby finally sanctions the said modification proposal and for this purpose modifies the notification sanctioning the said Regional Plan and for that purpose after the last entry the new entry is added in the schedule of Modification appended to the Notification dated 25.11.1997 sanctioning the said Regional Plan as follows;

In the schedule of modification appended to the said notification after the last entry, following new entry is added viz.

**ENTRY.**

The land bearing Gat.No. 56/3,4,5 & 57 of Mouje- Pimple-Jagtap, Taluka-Shirur, are deleted from "Residential Zone" and included in "Industrial Zone" with following condition.

**Conditions**-

1. All the required infrastructure facilities shall be provided by the owner at his own cost.
2. Land owner shall make arrangements at his own cost to prevent pollution as per rules and norms of M.P.C.B.
3. 23 m. Buffer strip between Residential & Industrial Zone is to be kept in the said land.(hereinafter referred to as "the said modification");

**NOTE** :-

A) The plans (No.1 & 2) bearing No.TPS-1807/1201/C.R.905/07/UD-13 showing the said modification is available for inspection by the general public during office hours on all working days at the following offices for period of one month

1. The Deputy director of Town Planning, Pune Division, Pune S.No.74/2, Sahkar Nagar, above Bank of Maharashtra, Pune-9.
2. The Collector, Pune.
3. Assistant Director of Town Planning, Pune Branch, 283, Narayan Peth, Pune-411030.

B) This notification is also available on Govt. web site www.urban.maharashtra.Gov.in

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V.M.Ranade

(V.M. Ranade)
Under Secretary to Government